जगावेगळी (Jagavegali)

कथा

लेखक : रेवण जाधव

Email :- jadhavrevan@rediffmail.com

Ph : 09370522501



मुखपृष्ठ : कनक वाईकर (परभणी)

kanak.waikar@gmail.com

Ph : 8888899126

**या कथेतील सर्व नांवे, घटना, स्थळे व संस्था काल्पनिक असून त्यांचा प्रत्यक्ष घटना, संस्था किंवा व्यक्तींशी साम्य आढळल्यास तो निव्वळ योगायोग समजावा.**

## *जगावेगळी*

मराठी मेट्रीमोनी वेबसाईटवरती लॉग-इन करून मराठी स्थळ शोधण्यासाठी विनय खाडेने नेहमीप्रमाणे सुरुवात केली.

विनय हा २९ वर्षांचा मराठी मुलगा, पुण्याच्या एका बँकेत पर्सनल लोन सेक्शनमध्ये काम करतो. मूळचा कोल्हापूरचा पुण्यात रूम शेअर करून रहातो. अडीच वर्षांचा कामाचा अनुभव, पुण्यात बसवलेलं बस्तान आणि घरातला मोठा, कर्ता मुलगा या सगळयामुळेच त्याच्या लग्नाचा विचार त्याच्या घरचे करताहेत म्हणून त्याने स्वत:च वेबसाईटवरून स्थळे शोधायला सुरुवात केली. तसे त्याचे पुण्यात काही नातेवाईक असूनदेखील तो स्वत: कुणाचीही मदत घेऊ इच्छित नाही. त्याचे मित्र, सहकारी यांना त्याने प्रेमविवाह करावा असे वाटते, पण विनयच्या मते लग्न हा त्याच्या एकट्याचा विषय नसल्याने तो प्रेमविवाह  करू शकत नाही. त्याच्या कौटुंबिक जबाबदाऱ्या तो काटेकोरपणे पार पाडतो आहे. आई आणि लहान भाऊ यांना त्याचा मोठा आधार आहे. म्हणून तो घर सांभाळणारी मुलगी शोधत आहे. आपली जन्माची जोडीदार हुशार, मनमिळावू, कुटुंबवत्सल, प्रपंच नेटाने करणारी हवी असे तो सर्वांना सांगतो. तो जी नोकरी करतो त्यात त्याचे सगळे भागून बचतसुद्धा होत आहे. गरज पडली तर बायकोने नोकरी करण्यास त्याची

हरकत नाही. वेबसाईटवरून स्थळे शोधून त्यांची सर्व माहिती मिळवायची आणि योग्य वाटले तर त्यांना भेटायचे असे त्याने ठरवले आहे.

शनिवारी बँकेला अर्धी सुटी असते तेव्हा तो निदान एक तास तरी ऑनलाईन स्थळे शोधत असतो. आज त्याला काही नवीन मुलींची माहिती मिळत असताना एका मुलीच्या प्रोफ़ाईलने त्याचे लक्ष वेधले. नाव होते शर्मिली सदानंदन, सध्या राहायला मुंबई येथे आणि आंतरजातीय विवाहाची तयारी, वय २६ वर्षे, एका एन.जी.ओ. सोबत राहून काम करते. विनयने जुजबी माहिती लिहून घेतली. या मुलीला फेसबुकवरती शोधता येईल असा विचार करून तो रूमवर जायला निघाला.

त्याच्या अपेक्षेप्रमाणे शर्मिली फेसबुकवर सापडली. त्याने तिला फ्रेंड रिक्वेस्ट पाठवली. विनयला वाटले की मैत्री करण्यात काय हरकत आहे? संध्याकाळचे जेवण झाल्यावर विनय पुन्हा त्याचा laptop उघडून बसला त्यावेळी शर्मिलीने त्याची रिक्वेस्ट स्वीकारली होती. मग विनयने तिचे प्रोफाईल तपासले. तिचे संस्कृतमधले पोस्ट, कवितांचे कलेक्शन, ग्रुप या सगळया गोष्टी खूपच विशेष होत्या. विनयला तिचा फोटो बघून मोहिनी पडल्यासारखे झाले. त्याने तिला मोबाईल नंबर मागितला आणि पाच ते सात मिनिटांत तिने तो पाठविला देखील.

आज एक आठवड्यानंतर शर्मिली आणि विनय यांच्यात खूप चांगली मैत्री झाली आहे. ते एकमेकांशी मोबाईलवरुन संध्याकाळी निदान अर्धा तास तरी बातचीत करतात. शर्मिलीचे मराठी इतके चांगले आहे की मराठी मुलीपण इतके अस्खलित मराठी बोलू शकत नसतील.

होता होता एक महिना सरला. आता विनयला शर्मिलीबाबत बरीच माहिती मिळाली आहे. तिचे विचार, हुशारी या बाबतीत तो नेहमीच तिची प्रशंसा करतो. आणि आता तर त्याला तिच्याबद्दल आकर्षण वाटू लागले आहे. त्याच्या मते, “अशी हुशार मुलगी आपल्या आयुष्यात आली तर लग्नानंतर घरातल्या प्रत्येक छोट्या-छोट्या गोष्टीमध्ये आपल्याला लक्ष घालावे लागणार नाही.” त्याने त्याच्याच नात्यातली अशी अनेक कुटुंब पाहिली आहेत कि ज्यांची लग्न होऊन बरीच वर्षे झाली तरी त्यांच्यात समजूतदारपणा नाही. नवरा-बायकोला एकमेकांबद्दल प्रेम नाही फक्त लग्न केलय म्हणून एकत्र राहायला लागतंय.

मग एके दिवशी विनयने सहजच विचारल्याप्रमाणे शर्मिलीला तिच्या जोडीदाराबद्दलच्या अपेक्षा विचारल्या. तिनेही मोकळेपणाने मनातले सगळे सांगितले. मग मात्र विनयची खात्री पटली कि त्याने शर्मिलीशी लग्न केले तर चुकीचे ठरणार नाही. तरीही त्याने एकदा ही गोष्ट घरच्यांना सांगण्याचे ठरवले. त्याच्या आईने त्याला सकारात्मक प्रतिसाद दिला. “संसार म्हणजे नवरा-बायकोने एकमेकांना कायम साथ देणे, परास्परांचा आदर करणे, प्रेम तर गरजेचे आहे. म्हणून तू तुला आवडेल त्या मुलीशी लग्न कर” असा सल्ला त्याच्या आईने दिला. आईने होकार दिला आणि विनयने शर्मिलीला भेटण्याची इच्छा मांडली.

रविवारी शर्मिली मुंबईहून पुण्याला यायला सकाळी लवकरच्या रेल्वेने निघाली. पुण्यात स्टेशनला विनयने तिला पिक केले. दोघे पहिल्यांदा दगडूशेठ गणपतीच्या दर्शनाला गेले. तिथून मग तुळशीबाग, मंडई असे फिरून झाल्यावर विनय शर्मिलीसोबत जेवण्यासाठी एका हॉटेलमध्ये गेला. त्याने पंजाबी डिशची ऑर्डेर दिली तर शर्मिलीने व्हेज बिर्याणी आणि सांबार मागवले. जेवणाच्या पहिल्याच घासाला शर्मिलीने त्या सांबाराची तारीफ केली. तिच्या म्हणण्यानुसार, “सांबार हे जास्त तिखट असता कामा नये. नाहीतर आमटी आणि इडली खाल्ली असे वाटते”.

मग तिने सांबार, रस्सम, इडली इत्यादी दाक्षिणात्य पदार्थांच्या रेसिपी विनयला सांगितल्या. विनयला लक्षात आले कि, हीला स्वयंपाक खूप छान करता येतो. गप्पा मारत, पुण्यात फिरत त्यांचा दिवस कसा गेला हे दोघांनाही समजले नाही. परतीच्या गाडीसाठी विनय शर्मिलीला सोडायला पुन्हा पुणे स्टेशनवर आला. जाता-जाता त्याने शर्मिलीला लग्नासाठी विचारले. शर्मिलीने त्याला दोन दिवसांचा वेळ मागितला.`

परंतु दुसऱ्याच दिवशी तिचा एक ई-मेल आला. त्यात तिने म्हटले होते – “मी परराज्यातली मुलगी आहे. २००४ साली तामिळनाडू मध्ये आलेल्या त्सुनामीमध्ये मी माझे सर्वस्व गमावून बसले आहे. एका एन.जी.ओ.ने आम्हांला मुंबईमध्ये आणून आसरा आणि

काम दिले. मी फार वर्षांपासून मुंबईमध्ये असल्यामुळे माझे मराठी छान आहे. मला शिक्षणाची आवड होती पण परिस्थितीमुळे मला शिक्षण आणि करियर करता आले नाही. माझ्या सारख्या अनाथ मुलीसोबत संसार मांडून तुला काय मिळणार आहे? मला तर एकटेपणाची सवय आहे. पण माझ्यामुळे तुझ्या आयुष्यात काहीतरी चुकीचे घडू नये म्हणून मी तुला पुन्हा एकदा विचार करण्याचा आग्रह करत आहे. प्लीज माझी बाजू समजून घे."

यावर विनयने काही रिप्लाय न देता दुसऱ्याच दिवशी मुंबई गाठली. त्या एन.जी.ओ.च्या ऑफिसमधले सगळे आश्चर्य व्यक्त करू लागले. मग त्या लोकांनीपण शर्मिलीला होकार देण्यास आग्रह केला. विनयच्या या वागण्यामुळे शर्मिलीचीपण खात्री पटली कि, 'हा मुलगा आपल्याला कधीही अंतर देणार नाही.'

आज एक महिन्यानंतर विनय-शर्मिलीचे लग्न रजिस्टर पद्धतीने पुण्यामध्ये झाले. त्या आधी त्याने एक वन-रूम किचन असलेले घर भाड्याने घेऊन ठेवले. लग्न, पूजा, जेजुरीचे दर्शन उरकल्यावर विनयचे कोल्हापूरवरून आलेले मोजके नातेवाईक परत गेले. आता विनयला शर्मिलीसोबत भरपूर एकांतात गप्पा मारता येणार आहेत. त्यांना हनीमूनसाठी पुण्याबाहेर जाण्याची गरज नाही. त्यांना इथेच मिळणारा एकांत खूप सुखावणारा आहे.

मिलनाच्या पहिल्याच रात्री दोघांनीही परस्परांवर पूर्ण विश्वास ठेवून सर्वस्व बहाल केले. विनयने शर्मिलीला सांगितले कि “आपल्या दोघांचीही वये काही खूप नाहीत त्यामुळे आपण निदान या वर्षी तरी बाळाचा विचार नको करायला.”

अजूनही विनयची दोन दिवसांची सुटी शिल्लक असल्याने तो घरीच बसून टिव्ही बघणे, बायकोच्या हातचे स्वादिष्ट जेवण खायचे आणि मूड झाला कि प्रणय करायचा असा दिनक्रम आहे.

ऑफिसमधले सगळे विनयला त्या दिवशी म्हणालेच कि, “शेवटी तू प्रेमविवाहच केलास ना. आता एकदा बायकोला ऑफिसला घेऊन ये.” त्यानुसार ठरवून विनयने एका शनिवारी दुपारी शर्मिलीला ऑफिसला यायला सांगितले. मग हाफ डे निमित्त विनयच्या सेक्शनचे ५ जण आणि नवविवाहित दाम्पत्य जेवायला हॉटेलमध्ये गेले. त्या दिवशी विनयने सगळ्यांना स्वत:ची प्रेम कहाणी पुन्हा एकदा सांगितली. सर्वांनी टाळ्या वाजवून या दोघांचे अभिनंदन केले आणि भेट म्हणून हातातल्या घड्याळांचा सेट दिला.

त्या रात्री शर्मिलीने विनयला बाईकवरून कुठेतरी लांब फिरायला जाण्याचा आग्रह केला. विनयने त्याप्रमाणे बाईकवरून कात्रजकडून एक्सप्रेस वे पकडला आणि मग बालेवाडीकडून पुन्हा शहरात आला. पौर्णिमेच्या रात्री थंड वारे झेलत बाईकवरून बायकोसोबत फिरण्याची मजा आज विनयने अनुभवली अगदी भरभरून. रात्रीचे पाऊणे एक वाजले असताना दोघे घरी पोहोचले. त्या रात्री दोनदा प्रणय आणि मग आराम.

मंगळवारी संध्याकाळी विनय घरी आला तर शर्मिली कसली तरी पूजा मांडून बसली होती. “ओम ऱ्हीम क्लीम चामुण्डाय नम:” असा मंत्रोच्चार करत तिने तिची पंधरा मिनिटांची पूजा आटोपली. ‘मंगळवारी देवीची पूजा करतात’ हे विनयला माहिती होते त्यामुळे त्याने शर्मिलीला जास्त काही विचारले नाही. “मला एक स्पेशल कला येते” असे शर्मिलीने विनयला झोपताना सांगितले. यावर तो म्हणाला, “तुला जे जमते ते मला आवडते. तू माझ्यासाठी स्पेशलच आहेस”.

बुधवारी विनय ऑफिसला जायला निघाला तेव्हा दारात उभ्या असलेल्या शर्मिलीने विनयला “संध्याकाळी तुझ्यासाठी सरप्राईज आहे” असे सांगितले. विनय हसत-हसत जीना उतरून गेला. नुकतेच झालेले लग्न आणि ते ही पाहिजे त्या मुलीसोबत त्यामुळे विनयसाठी स्वर्ग दोन बोटे शिल्लक राहिला होता. सगळे कसे अगदी त्याच्या मनाप्रमाणे घडत होते.

त्याच दिवशी संध्याकाळी विनय घरी आला. कपडे बदलून तो बाथरूम मध्ये फ्रेश व्हायला गेला. बाहेर आल्यावर बघतो तर काय त्याच्या समोर दुसरा विनय उभा होता. हुबेहूब त्याच्या सारखा, कपडेही तसेच सेम टू सेम. विनयचा स्वत:च्या डोळयांवर विश्वास बसेना. त्याने हात पुढे करून त्या दुसऱ्या विनयला स्पर्श केला. “मी शर्मिली आहे. मी तुला म्हणाले होते ना की मला स्पेशल कला येते. मी कुणाचेही रूप घेऊ शकते”. त्या दुसऱ्या विनयचा आवाजही खऱ्या विनयचाच होता. विनयसाठी मात्र हे सरप्राईज न होता त्याच्यासाठी तो एक धक्का होता.

मग क्षणाचाही विलंब न करता दुसरा विनय उजव्या पायाचा तळवा डाव्या गुडघ्यावर ठेऊन एका पायावर उभा राहिला. दोन्ही हात छातीजवळ घेत जोडले आणि ‘ओम ऱ्हीम क्लीम चामुण्डाय नम:’ चा मंत्र तीनदा म्हणत हात डोक्याच्यावरती नेले. डोळे मिटलेले होते आणि अवघ्या एका मिनिटात तो विनय शर्मिली बनून विनयच्या समोर हजर. विनय घाबरलेला आहे हे तिच्या लक्षात आले. मग तिने त्याला मिठी मारत पुन्हा सांगितले, “आय कॅन बीकम एनी बडी”.

विनय जेवणानंतर झोपायला म्हणून बेडरूममध्ये गेला. थोड्या वेळाने भांडी घासून झाल्यावर शर्मिलीपण बेडरूममध्ये आली. विनय जरा दचकला. शर्मिलीने त्याला आपल्याला अवगत असलेल्या विद्येबद्दल सांगायला सुरुवात केले, “मी लहानपणापासून देवीची उपासना करत होते. एका गुरुंनी मला त्यांचे शिष्यत्व दिले आणि मला काही विशेष कला शिकवायला सुरुवात केली. पण माझे शिक्षण पूर्ण होण्यापूर्वीच दुसऱ्या एका शिष्याने त्यांचा खून केला म्हणून मला जास्त काही शिकायला मिळाले नाही. पण तरी मी जास्त अभ्यास करून या कलेत स्पेशलीटी मिळविली. आणि इतक्या दिवसांनी मी त्याची टेस्ट घेतली. त्यात मला सक्सेस मिळाले.”

मग तिने पुन्हा एकदा तशीच पोज घेत मंत्रोच्चार केला आणि एका मिनिटात तिने एका शाळकरी मुलीचे रूप घेतले. “ही माझी मैत्रीण तेजस्विनी. आम्ही शाळेत एकत्र शिकायला होतो. आम्ही बेस्ट फ्रेण्ड होतो. बघ मी अगदी तिच्या ओरिजिनल रूपात आली आहे. मी कुणाचेही रूप घेऊ शकते. फक्त त्या व्यक्तीला मी पाहिलेले असले पाहिजे.” मग शर्मिली पुन्हा मूळ रूपात आली. “तू फक्त कुणालाही याबद्दल सांगू नकोस नाहीतर माझी पॉवर कमी होऊन माझी ही विद्या निघून जाईल. प्लीज माझे हे सिक्रेट कुणालापण बोलू नकोस हां.”

त्या रात्री विनयने एकदाच प्रणय केला आणि झोपला.

त्यानंतर शर्मिली स्वत:हून एखाद्या नटीचे रूप घेऊ लागली आणि विनय रात्रीतून दोनदा प्रणय करून झोपू लागला. या प्रकारामुळे त्यांच्यात शारीरिक आकर्षण तर कायम राहिलेच सोबत विनयचा मूड नेहमीच चांगला राहू लागला. तर शर्मिलीला पौर्णिमेला रात्री बाराच्या सुमारास चंद्राच्या प्रकाशात फिरायला जाणे आवश्यक असल्याने प्रत्येक पौर्णिमेला ते दोघे बाईकवरून लांबवर फेरफटका मारून येऊ लागले.

एके रात्री शर्मिलीने विनयला विचारले, “तुम्हाला कोणती मुलगी आवडली नाही का हो कधीच?”

“नाही.” विनयचे उत्तर.

“पण तरीपण एक कोणीतरी असेल ना की जिने तुम्हाला इम्प्रेस केले. तिच्यासारखी तुमची बायको असावी असे तुम्हाला वाटले असेल.” शर्मिलीने अजून खोदून विचारले.

विनय थोडा नाराज झाला. तरी तो म्हणाला, “आमच्या ऑफिसमधली ती सायली मोहिते आहे ना तिने मला फार इम्प्रेस केले होते. कुणी म्हणणार नाही तिला एक मुलगा आहे म्हणून. ती नेहमी साडी घालते. नीटनेटकी राहते. तिला बऱ्याच गोष्टी माहिती आहेत. चांगली शिकलेलीपण आहे ती.”

मग शर्मिली बेडवरून उठून विनयच्या समोर उभी राहिली. तिची पोज, मंत्रोच्चार आणि सायली विनयसमोर उभी. विनय तिच्याकडे बघून हसला. तिने हसून नजर खाली घातली. विनयने पुढे होऊन तिला मिठीत घेतले. “लाईट बंद करा”, सायली म्हणाली. पण विनयने लाईट न बंद करता प्रणय करायचे ठरवले. त्याने तिच्या साडीचा पदर एका हातात धरला. तशी सायलीने स्वत:भोवती एक गिरकी घेतली आणि तिची साडी थोडी फिटली. सायली पुन्हा त्याच्याकडे बघून हसली. विनयने साडी ओढली. सायली पुन्हा गोल फिरली अगदी साडी पूर्ण निघेपर्यंत. विनयने साडी एका कोपऱ्यात फेकून दिली. विनय तिच्या जवळ गेला आणि एक-एक करत तिचे बाकीचे कपडे काढून तिला विवस्त्र केले आणि बेडवर झोपवून स्वत:पण तिच्यासोबत झोपला. आज त्याने तीन वेळा प्रणय केला.

सकाळी मोबाईल मधला अलार्म वाजल्यावर विनयला जाग आली त्याने अलार्म बंद केला. अंगावरचे पांघरून बाजूला करत तो उठला आणि रात्रभर चालू असलेली लाईट त्याने बंद केली. वळून बघतो तर सायली विवस्त्र अवस्थेत त्याच्यापुढे उभी. त्याने तिला मिठी मारली.

“कामाला जायला उशीर होईल. सोडा मला आणि आवरायला घ्या”, सायली म्हणाली. तिने पुन्हा पोज घेत मंत्रोच्चार केला आणि समोर विवस्त्र शर्मिली उभी. विनय हसला आणि अंघोळीसाठी बाथरूममध्ये गेला. शर्मिलीचे ते सिक्रेट विनयने कुणालाही सांगितले नाही. कारण त्यात त्याचाच मोठा फायदा होता.

त्या नंतरच्या मंगळवारी संध्याकाळी शर्मिलीने पुन्हा पूजा केली. बुधवारी सकाळी विनय ऑफिसमध्ये पोहोचून कामाला सुरुवात करणार इतक्यात रोहितने सायलीच्या अपघाताची बातमी त्याला दिली. “बसमध्ये चढताना सायलीचा तोल गेला आणि ती बसच्या मागच्या चाकाखाली सापडली. छातीवरून चाक गेल्याने सायली जागच्या जागीच मेली”. विनय या बातमीने सुन्न झाला. त्याला काय करावे सुचेना. त्यादिवशी तो फक्त सायलीच्या अंत्यसंस्काराला गेला पण कुणाशीही काहीही बोलला नाही. त्याच्या मनात अपराधीपणाची भावना निर्माण झाली होती. त्याला पुढचा पूर्ण आठवडाभर ही गोष्ट सतावत राहिली. म्हणून त्याने तीन दिवसांची सुटी मागितली आणि ती मिळाल्यावर शर्मिलीला घेऊन तो गावी गेला.

बदललेल्या वातावरणामुळे विनय बराच नॉर्मल झाला. गावाकडे आई, भाऊ आणि बालपणीचे मित्र यांच्यासोबत त्याचा वेळ खूप मजेत गेला. सायलीच्या मृत्यूचे दु:ख काहीवेळासाठी तो विसरून गेला.

विनय परत आल्यावर त्याच्या बिल्डींगमधले काहीजण त्याला भेटून गेले. त्याच्या तब्येतीची विचारपूस करायला त्याचे शेजारी आणि इतरही मजल्यावरचे लोक

येऊन काळजी घेण्याचा सल्ला देऊन गेले. तो आणि ऑफिसमधली त्याची टीम पुन्हा नव्याने कामाला लागली. अकाऊन्ट सेक्शनमध्ये सायलीच्या जागेवर नवीन मुलगा जॉईन झाला. दिवसभर काम आणि संध्याकाळी शर्मिलीचा सहवास यामुळे विनय आता त्या धक्क्यातून पूर्ण बाहेर आला. आता पुन्हा त्यांच्यात पूर्वीसारखा दोनदा प्रणय होऊ लागला.

दरम्यान शर्मिलीची मंगळवारी पूजा आणि पौर्णिमेच्या रात्री फिरायला जाणे यात खंड पडला नव्हता. एके दिवशी शर्मिलीने गंमत म्हणून शेजारच्या घरात झाडलोट करायला येणाऱ्या संगीताचे रूप घेतले. विनयला मात्र ते आवडले नाही, “शी, ती कसली घाणेरडी रहाते. तिच्या अंगाचा वास किती येतो ते बघितलेस का कधी?” असे म्हणत विनयने स्वत:ची नाराजी व्यक्त केली. मग पुन्हा साधनेची पोज, मंत्रोच्चार आणि शर्मिली मूळ रूपात हजर.

‘विनय-शर्मिलीच्या लग्नाला आता सात महिने होऊन गेले तरी अजून गोड बातमी का नाही?’ यासाठी विनयच्या आईने एकदा सूनबाईला फोन करून विचारले. तेव्हा शर्मिलीने “आई यांचे बहुतेक प्रमोशन होणार आहे म्हणून आम्ही थांबलोय. मग पगारपण वाढेल. मग विचार करू” असे सांगून वेळ मारून नेली. हा घडला प्रकार तिने विनयला सांगितल्यावर तो फक्त हसला. त्यालासुद्धा इतक्यात बाळ नको होते.

एके दिवशी विनय रविवारी घरी असताना पहिल्या मजल्यावरची निकिता चौधरी त्याला भेटायला आली. तिला बी.कॉम. नंतर उच्चशिक्षणासाठी कुठल्या प्रकारे लोन मिळेल याची माहिती हवी होती. विनयने तिला एज्युकेशन लोन्सच्या तीन निवडक ऑफर्स सांगितल्या. त्यांचे बोलणे चालू असताना शर्मिलीने निकिताला जेवण्यासाठी आग्रह केला. पण तिने नकार दिला. “वडिलांना मी तुमच्याकडे जेवलेली आवडणार नाही” असे सांगून तिने फक्त चहा आणि पोह्यांवर भागवले. निकिता हुशार आहे म्हणून तिचे वडील तिला एम.बी.ए. किंवा अजून काहीतरी शिकवण्यासाठी तयार झाले आणि पैशांसाठी लोन मिळेल का याची माहिती तिला घ्यायला सांगितली. मिळालेली माहिती आणि आदरतिथ्यासाठी निकीता विनय-शर्मिलीला “थ्यांक्यू” म्हणाली आणि निघून गेली.

दुपारी जेवण उरकून हे दोघे आराम करायला म्हणून बेडवर पहुडलेले असताना शर्मिली अचानक उठून उभी राहिली आणि “हे बघ” असे म्हणत तिने साधनेची पोज घेतली मंत्रोच्चार केला आणि एक मिनिटात विनयसमोर निकिता उभी होती. विनयने पहिल्यांदा बेडरूमची खिडकी बंद केली. मग तो निकिताच्या समोर उभा राहिला. तिला नीट न्याहाळत तो तिच्याभोवती फिरला. पुन्हा समोर उभा राहिला. त्याने तिचा डावा हात उजव्या हातात घेतला आणि स्वत:च्या गालावरून फिरवला. मग तो गुडघ्यावर बसला. त्याने तिच्या कॉटन जीन्सचे बटन उघडले आणि चेन खाली खेचली. मग त्याने तिचा टी शर्ट थोडा वर सरकवून तिच्या बेंबीची पप्पी घेतली आणि बेडवर जाऊन बसला. आता निकिताने कॉटन जीन्स, टी शर्ट, आतले कपडे स्वत:च्या हाताने काढले आणि विवस्त्र होऊन

विनयसमोर उभी राहिली. विनयला जोम चढला त्याने उजवा हात पुढे केला. निकितानेही तिचा उजवा हात त्याच्या हातात दिला. विनयने निकिताला ओढून घेतले. तो बेडवर पहुडला आणि निकिता त्याच्या अंगावर.

एका प्रणयानंतर शर्मिली पुन्हा मूळ रूपात आली. विनयने तिच्याकडे प्रश्नार्थक नजरेने पाहिले. “ओ साहेब ती मुलगी आपल्या जवळ रहाते. ती आणि तुम्ही कुणाला अशा अवस्थेत दिसलात तर गडबड होईल” निकिताने विनयला समजावून सांगितले. रात्री जेवताना विनयने शर्मिलीला रिक्वेस्ट केली, “जानू पुन्हा एकदा निकिता. फक्त एकदाच, मी नंतर कधीही नाही सांगणार पण आज रात्रभर. फक्त आजची रात्र”.

त्याच्या इच्छेप्रमाणे भांडी घासून झाल्यावर शर्मिली निकिता बनून बेडजवळ उभी राहिली पण तिने आधीच सगळे कपडे काढले होते. आज विनयने पाच वेळा निकिताला झोपेतून उठवून प्रणय केला.

सोमवारी सकाळी तो बाथरूममध्ये असताना निकिता मंत्र म्हणत असल्याचे त्याला ऐकू आले. कालच्या प्रकारामुळे तो खूप आनंदी होता. त्याची आंघोळ झाली आणि चहा पीत असताना शर्मिलीने त्याला पेपर वाचायला दिला आणि ती अंघोळीला निघून गेली. तेव्हा विनयने बंद दाराआडून हळू आवाजात विचारले, “कोण अंघोळ करतंय?

शर्मिली का निकिता?” यावर बाथरूमचे दार उघडून निकिताने विनयला आत यायचा इशारा केला. पुन्हा प्रणय आणि मग सगळे आवरून विनय ऑफिसला निघून गेला.

मंगळवारची पूजा केल्यावर शर्मिलीने विनयला “आज बाहेर जेवायला जाऊया का?” असे विचारले. विनयने होकार दिला आणि दोघेही डेक्कनच्या एका हॉटेलात जेवायला गेले. आपली बायको आपल्याला पाहिजे त्या रूपात प्रणयासाठी उपलब्ध आहे हा विचार त्याला खूपच आनंद देत होता.

शनिवारी विनय ऑफिसमधून निघण्याची तयारी करत असताना शर्मिलीने त्याला फोन केला. “अग बाई मी घरीच यायला निघालोय. थोडा धीर धर पोहोचतोच अर्ध्या तासात” विनयने फोन उचलून तिला उत्तर दिले. मात्र शर्मिलीचे निरोप ऐकून विनय पुन्हा एकदा सुन्न झाला.

घरी पोहोचलेल्या विनयला बिल्डींगच्या आवारात रुग्णवाहिका दिसली. पोलीस पंचनामा करत होते. बिल्डींग आणि आजूबाजूच्या परिसरातले लोक जमा झालेले होते. विनयच्या कानात मात्र शर्मिलीचे शब्द घुमत होते, “निकिताने आत्महत्या केली”.

“गच्चीवरून उडी मारून तिने जीव दिला” असे त्याला कुणीतरी जीना चढताना सांगत होते पण विनयचे तिकडे लक्षच नव्हते. त्याच्यासाठी हा अजून एक धक्का होता.

तो घरात गेला. पाठोपाठ इतका वेळ जिन्यात उभी असलेली शर्मिली घरात आली. तिने दार लावले. विनय बेडवर बसून रडत होता. तिने त्याला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला पण विनय आता जोराने रडू लागला. “विनय रडू नकोस असा जोरात नाहीतर लोक तुझ्यावर संशय घ्यायला कमी करणार नाहीत. तिच्या पर्सनल आयुष्यात काय प्रॉब्लेम होते ते आपल्याला माहिती नाही. तिच्या सुसाईडचे कारणही कुणालाच माहिती नाही. तू शांत हो.” विनय पुन्हा टेन्शनमध्ये आला.

निकिताच्या आई-वडिलांना तर काहीच कळत नव्हते की त्यांच्या एकुलत्या एक मुलीने अशी आत्महत्या का केली. म्हणून त्यांच्या एका नातेवाईकाने एका मुनीजींचा सल्ला घेण्याचे सुचवले. त्यानुसार निकिताच्या तेराव्याच्या दिवशी मुनीजी त्यांच्या घरी आले. घरात आणि नंतर गच्चीवर त्यांनी थोडा वेळ घालवला. “इस जगह में कोई दुष्ट शक्ती है. मुझे उसकी बू आ राही है. तुम्हारी बेटी की मौत के पीछे ये शक्ती हो सकती है”. मुनीजी म्हणाले आणि निघून गेले.

विनयने निकिताच्या त्या नातेवाईकाकडून मुनीजींच्या घराचा पत्ता घेतला. त्याच्या मनातली अपराधीपणाची भावना काही केल्या त्याला स्वस्थ बसू देत नव्हती. त्याच दिवशी तो त्या मुनीजींना जाऊन भेटून संध्याकाळी थोडा उशिरा घरी आला.

शर्मिलीने दार उघडले आणि विनय घरात आला तशी तिने त्याच्याकडे चमकून पाहिले. विनय काहीही सांगायच्या मनस्थितीत नव्हता. त्याने कपडे बदलले आणि बेडवर जाऊन बसला. मग शर्मिलीने त्याला जेवणासाठी आवाज दिला. डोळे पुसत विनय जेवायला बसला. तो आज खूपच अबोल वाटत असल्याने शर्मिलीने त्याला "डॉक्टरांकडे जायचे का?" असे विचारले. पण विनय ने नकारार्थी मान हालवून कसेबसे जेवण उरकले आणि पुन्हा बेडवर जाऊन बसला.

रोजच्या सारखी शर्मिली भांडी घासून झोपण्यासाठी बेडवर विनयच्या शेजारी जाऊन बसली. "मी त्या मुनीजींना जाऊन भेटलो. त्यांना मला आलेल्या दडपणाचे सांगितले. त्यांनी मला कुलदैवताचे नामस्मरण करायला सांगितलंय. म्हणाले वेळ आली कि सगळे ठीक होईल."

"चूक" शर्मिली जोरात ओरडली. "तू त्यांना भेटून माझ्याबद्दल सांगितलंस आणि सायली आणि निकिताच्या मरणाचे कारण विचारलेस. मला माहिती आहे. तू घरात आल्यावर मला तुझ्या अंगाला येणारा धूपाचा वास सगळे सांगून गेला. तू त्यांना माझ्या विद्येबद्दल पण बोललास ना?"

शर्मिलीचा पारा चढला होता. विनयने तिच्याकडे दचकून पाहिले. मुनीजी आणि माझे काय बोलणे झाले हे शर्मिलीला कसे काय कळाले? याचे त्याला आश्चर्य वाटू लागले. शर्मिलीची समजूत घालण्यासाठी त्याने तिचा हात हातात घेण्याचा प्रयत्न केला, पण .....

शर्मिलीने त्याचा हात बाजूला झटकला. बेडवरून उठून ती विनयच्या समोर उभी राहिली आणि एका मिनिटात तिने आक्राळ-विक्राळ रूप धारण केले. तिचा बदललेला कुरूप चेहरा, विचित्र आवाज यामुळे विनयची दातखीळ बसली. त्याचे हातपाय थंड पडले, जड झाले त्याला बोलणे, हालचाल करणे अशक्य झाले. त्याला अर्धांगवायू झाल्यासारखे झाले.

“तू माझ्याबद्दल त्या बाबाला सांगून खूप मोठी चूक केलीस विनय. मी तुला सांगितले होते कुणाला काही बोलू नकोस. पण तू बोललास. तुला माझ्यावर संशय आला म्हणून तू त्याच्याशी बोललास ना? मग ऐक, मीच निकिताला गच्चीवरून उडी मारण्यासाठी तिच्यावर मोहिनी केली होती. आणि तुझी ती सायलीपण माझ्यामुळेच बस खाली सापडून मेली.”

विनय फक्त ऐकू शकत होता. त्याला बोलता येत नसले तरी त्याच्या डोळ्यातला प्रश्नार्थक भाव शर्मिलीने हेरला.

“त्या दोघी तुझ्या रोजच्या आयुष्याचा एक भाग होत्या. मी त्यांचे रूप घेऊन तुला मजा घेऊ दिली पण नंतर माझ्या लक्षात आले कि तू पुन्हा थेट त्यांच्याशी संबंध ठेऊ शकतोस म्हणून मला त्यांना मारायला लागले. नाहीतर तू त्यांनापण माझ्या विद्येचे सिक्रेट सांगितले असतेस. मला त्यांच्यापासून धोका होता तसाच आता तुझ्यापासून धोका आहे त्यामुळे आता तुला पण मारायला लागणार. विनय गुड-बाय. विनय तू मरणार आहेस आता. तू मरणार आहेस. विनय तू मरणार आहेस.”

आणि दुसऱ्या क्षणी विनयला हृदय विकाराचा जोराचा झटका आला आणि पुढच्या पाचच मिनिटांत त्याने प्राण सोडला.

दुसऱ्या दिवशी सकाळी अकरा वाजले तरी विनयच्या घरातून कुणी बाहेर आले नाही कि कुणाचा आवाज नाही आणि दार थोडेसे उघडे आहे हे पाहून शेजारचे पै काका दार उघडून विनयला आवाज देऊ लागले. पण आतून काहीही प्रतिसाद न आल्याने ते थेट घरात घुसले आणि त्यांना विनय दिसला बेडवर पडलेला. त्याच्या चेहऱ्यावर भीती स्पष्ट दिसत होती. काकांनी अजून काही जणांना जमवून विनयला हॉस्पिटलमध्ये नेले पण त्याचा मृत्यू रात्री दहा ते बाराच्या दरम्यान झाल्याचे डॉक्टरांनी सांगितले.

इकडे बिल्डींगमधल्या बायका शर्मिली कुठे गेली आहे हे शोधत होत्या. पण दुपार उलटून गेली तरी ती न सापडल्याने आणि तिचा फोनही लागत नसल्याने तिचा शोध थांबवला. थोड्यावेळाने विनयची आई आणि भाऊ येऊन पोहोचले. संध्याकाळी सगळे मित्र, नातेवाईक, ऑफिसमधले सहकारी यांच्या समोर विनयला अग्निडाग दिला.

विनयच्या अचानक जाण्याने बिल्डींगमध्ये वेगवेगळे तर्क-वितर्क केले जाऊ लागले. कुणी म्हणे “त्या नवरा बायकोची भांडणे झाली असणार. त्यात त्याची बायको

रात्रीतून घर सोडून गेली आणि विनयला त्रास झाला आणि तो मेला". तर कुणी म्हणतंय "बायकोने याला काहीतरी खायला घातले आणि स्वत: पळून गेली"

बोलणा-यांची तोंडे धरता येत नाहीत हेच खरे. पण तरीही शर्मिली नक्की कोण होती? तिने जे काही स्वत:बद्दल सांगितले होते ते तरी खरे होते का? शर्मिली हे तरी तिचे खरे रूप होते का? आपले सिक्रेट लपवण्यासाठी तिने ३ जणांचे जीव घेऊन काय साध्य झाले? आणि सर्वात महत्वाचे म्हणजे आता ती कुठे आहे???

शर्मिलीने (?) सायलीला मारले त्यादिवशी आमावस्या होती आणि निकिताला आत्महत्या करायला लावली तो दिवसही आमावास्येचाच होता हा निव्वळ योगायोग नसावा. जशी तिला पौर्णिमेच्या रात्री चंद्रप्रकाशात फिरून स्वत:ची शक्ती टिकवता येत होती, तशीच तिने स्वत:च्या शक्तीसाठी पहिल्या दोघींचे बळी दिले होते का?

ही जगावेगळी मुलगी, तिची ती जगावेगळी विद्या किंवा कला किंवा शक्ती अनेक प्रश्नांना जन्म देऊन गेली.

# ई साहित्य प्रतिष्ठान

## एक दम : तिन कामं

अभिनंदन मित्रांनो.

तुम्ही हे छोट्टुसं पुस्तक वाचून संपवलंत. थोडा टाईम पास झाला. पण टाईम फ़ुकट तर नाही गेला ना? झालंय काय की आज समाजाचं मन मुर्दाड होत चाललंय. सहसंवेदना संपतच चाललीय. अगदी आपल्या शेजारी अन्याय होत असताना बघे बनणाऱ्यांची संख्या वाढत चालली आहे. आपण फ़क्त आपल्यापुरतं बघावं असा विचार करणाऱ्यांची संख्या वाढते आहे. हे पोटार्थी समाजाचं लक्षण आहे. वाचन किंवा तत्सम संस्कारांपासून दूर जाणाऱ्या समाजाचं हे लक्षण आहे. म्हणून वाचन संस्कृती रुजायला हवी. एका छोट्याशा पुस्तकातून किती धडे मिळतात. तेही मनोरंजनासह. अशी खूप सारी ई पुस्तकं घेऊन ई साहित्य प्रतिष्ठान गेली काही वर्षं फ़ुकट वाटत असते. अक्षरशः शेकडो पुस्तकं. एकाहून एक भारी. सुंदर. मस्त. झक्कास. लय भारी. वाचन संस्कृती रुजवण्याच्या असंख्य लोकांच्या प्रयत्नांत आम्ही सहभागी आहोत. तुम्हीही व्हा.

ई साहित्य प्रतिष्ठानच्या वेबपेजवर सातत्याने नवनवीन भर पडत असते. आपण पहाता ना? नवीन सुमारे तीस पुस्तकं लवकरच येत आहेत. सगळीच तुम्हाला हवी असतील तर संपर्कात रहा. VIP सभासद बना.

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे. आपल्या ओळखीच्या दहा लोकांचे मेल आय डी कळवा आणि बना VIP सभासद.

एका दमात तीन कामं.

1. पहिलं म्हणजे तुम्ही VIP सभासद बनता. तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानचं पुस्तक ई मेलवर सर्वात आधी मिळतं. त्यांच्या प्रत्येक कार्यक्रमाचं आमंत्रण मिळतं. त्यांच्या भावी योजनांची माहिती मिळते. त्यांच्या कामात स्वतः सहभागी होण्याची संधी मिळते.

2. ज्या दहा किंवा अधिक मित्रांना तुमच्यामुळे फ़्री पुस्तकं मिळतात ते खुश होतात. त्यांना त्यांच्या आवडीची पुस्तकं मिळाली की ते इतर लोकांना तुमच्याबद्दल सांगतात. त्यांच्यासाठी तुम्ही म्हणजेच ई साहित्यचे प्रतिनिधी बनता.

3. आणि यातून तुम्ही मराठी भाषेच्या संवर्धनाला अमूल्य असा हातभार लावता. आमचा उद्देश आहे मराठीतल्या सहा कोटी साक्षरांना वाचक बनवणं. आणि हे लक्ष्य साध्य करणं हे केवळ आणि केवळ मराठी लोकांना त्यांच्या भाषेवर असलेल्या प्रेमातूनच शक्य आहे. आपल्या भाषेचं राज्य व्हावं म्हणून १०६ हुतात्मे झाले. आपल्या भाषेनं राजा व्हावं म्हणून आपण एक दहा-वीस ई मेल आयडी देणारच ना! वाचनाची आवड असो वा नसो. फ़क्त मराठी साक्षर अशा दहा लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांना वाचनाची आवड आपोआप लागेल. आपणच लावू. लावूच लावू. करूनच दाखवू.

आहे ना : एक दम : तीन कामं.

संपर्क साधा : esahity@gmail.com

ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे. त्यामुळे आपले मित्र आपल्यावर खुश होतील. शिवाय आम्ही ही खात्री देतो की या ई मेल्सचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी साहित्य पाठवण्यासाठीच केला जाईल. इतर कसल्याही जाहिराती पाठवून त्यांना त्रास दिला जाणार नाही. तेव्हा लवकरात लवकर आपल्या माहितीतल्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या.

www.esahity.com या वेबसाईटला भेट द्या.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य प्रतिष्ठान

